**राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेंतर्गत आर्थिकदृटया दुर्बल घटकातील पात्र विद्यार्थ्यांसाठी लाभाची व्याप्ती वाढविणे व नवीन अभ्यासक्रमाचा समावेश करण्याबाबत.**
**अटींमध्ये सुधारणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३३२(भाग-३)/तांशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२.
दिनांक: ०७ ऑगस्ट, २०१८

**संदर्भ**: शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३३२/तांशि-४, दिनांक: ०७/१०/२०१७

**प्रस्तावना** :

मराठा मोर्चाच्या मागण्यां संदर्भात निर्णय घेण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या मंत्रिमंडळ उपसमितीच्या दिनांक ०९/०१/२०१८ च्या आढावा बैठकीत मंत्रिमंडळ उपसमितीने शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३३२/तांशि-४, दिनांक ०७/१०/२०१७ अन्वये राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेकरीता लागू केलेल्या अटींमधील अट क्र. २२, ३०, ३१ व ४१ सुधारीत करुन त्याप्रमाणे आवश्यक ते आदेश निर्गमित करण्यात यावेत, असे निदेश दिले आहेत. आर्थिक वर्ष २०१७-१८ संपूष्टात आल्याने आता अट क्र. ४१ सुधारित करण्याची आवश्यकता राहीली नाही. मंत्रिमंडळ उपसमितीने दिलेल्या निदेशानुसार दि.०७/१०/२०१७ च्या शासन निर्णयामधील उर्वरीत अटी सुधारीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

संदर्भाधिन दिनांक ०७/१०/२०१७ च्या शासन निर्णयामधील राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेंतर्गत लाभाच्या पात्रतेसाठी “अटी व शर्ती” या मथळयाखालील अट क्र. २२, ३० व ३१ खालीलप्रमाणे सुधारीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अट क्रमांक | मूळ अट | सुधारीत अट |
|---|---|---|
| २२ | सदर योजनांतर्गत लाभ घेण्यासाठी संबंधित शैक्षणिक वर्षात इच्छुक अर्जदार विद्यार्थ्यांची प्रवेशित अभ्यासक्रमासाठी किमान ५०टक्के उपस्थिती आवश्यक असून सदरची उपस्थिती ही आधारसंलग्नीत बायोमेट्रीक उपस्थिती प्रणालीवर विद्यार्थ्यांनी नोंदविणे आवश्यक असेल. तथापि, संबंधित विद्यापीठ/महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ /महाराष्ट्र राज्य माध्यमिक आणि उच्च | सदर योजनांतर्गत लाभ घेण्यासाठी संबंधित शैक्षणिक वर्षात इच्छुक अर्जदार विद्यार्थ्यांची प्रवेशित अभ्यासक्रमासाठी किमान ५०टक्के उपस्थिती आवश्यक असून सदरची उपस्थिती ही आधारसंलग्नीत बायोमेट्रीक उपस्थिती प्रणालीवर विद्यार्थ्यांनी नोंदविणे आवश्यक असेल. तथापि, संबंधित विद्यापीठ/महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ /महाराष्ट्र राज्य माध्यमिक आणि उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ |

| | | |
|---|---|---|
| | माध्यमिक शिक्षण मंडळ यांच्या प्रचलित नियमानुसार त्यांनी परीक्षांसारख्या अन्य विविध प्रयोजनार्थ विहित केलेल्या उपस्थितीच्या प्रमाणाची स्वतंत्रपणे सर्व संबंधित विद्यार्थ्यांनी पूर्तता करणे आवश्यक असेल. | यांच्या प्रचलित नियमानुसार त्यांनी परीक्षांसारख्या अन्य विविध प्रयोजनार्थ विहित केलेल्या उपस्थितीच्या प्रमाणाची स्वतंत्रपणे सर्व संबंधित विद्यार्थ्यांनी पूर्तता करणे आवश्यक असेल. मात्र अंमलबजावणी करताना व्यवहार्यतेचे भान ठेऊन टप्प्या टप्प्याने राबविण्यात यावी, तूर्त सक्ती नाही. |
| ३० | सदर योजनेंतर्गत पात्र अभ्यासक्रम राबविणाऱ्या संबंधित शैक्षणिक संस्था (NAAC, NBA इ.) मूल्यांकन/ पुर्नमूल्यांकन करण्यास पात्र ठरल्यानंतर त्यांना शैक्षणिक वर्ष २०१८-१९ च्या अखेरपर्यंत सक्षम शिखर संस्था/यंत्रणा/मंडळाकडून असे मूल्यांकन व दर्जाचे मानांकन प्राप्त करणे (Assessment and Accreditation) आवश्यक राहील. तद्नंतर शैक्षणिक वर्ष २०१९-२० पासून संबंधित सक्षम शिखरसंस्था /मंडळाकडून (NAAC, NBA इ.) मूल्यांकन व दर्जा निश्चिती करुन मानांकन प्राप्त न केल्यास अशा संस्थांचे मुल्यांकन व दर्जा मानांकन प्राप्त होईपर्यंत अशा शैक्षणिक संस्थांना योजनेतून वगळण्यात येईल. तद्नंतर केवळ मानांकन प्राप्त करणाऱ्या शैक्षणिक संस्थेमध्ये नव्यानेप्रथम / थेट व्दितीय वर्षासाठी प्रवेश घेणाऱ्या विद्यार्थ्यांकरीताच सदर योजना लागू राहील. | सदर योजनेंतर्गत पात्र अभ्यासक्रम राबविणाऱ्या संबंधित शैक्षणिक संस्था (NAAC, NBA इ.) मूल्याकंन/ पुर्नमूल्यांकन करण्यास पात्र ठरल्यानंतर त्यांना शैक्षणिक वर्ष २०१८-१९ च्या अखेरपर्यंत सक्षम शिखर संस्था / यंत्रणा/ मंडळाकडून असे मूल्यांकन व दर्जाचे मानांकन प्राप्त (Assessment and Accreditation) करुन घेण्यासाठी शिखर संस्थांकडे / मंडळांकडे अर्ज करणे क्रमप्राप्त राहिल. |
| ३१ | या योजनेंतर्गत व्यावसायिक पदवी, पदव्युत्तर पदवी व पदविका अभ्यासक्रमासाठी प्रवेशित लाभार्थी विद्यार्थ्यांपैकी किमान ५० टक्के विद्यार्थ्यांना नोकरीची संधी (Placements) मिळवून देण्याची जबाबदारी ही संबंधित महाविद्यालय/ तंत्रनिकेतन यांची राहील. | या योजनेंतर्गत व्यावसायिक पदवी, पदव्युत्तर पदवी व पदविका अभ्यासक्रमासाठी प्रवेशित लाभार्थी विद्यार्थ्यांपैकी किमान ५० टक्के विद्यार्थ्यांना नोकरीची संधी (Placements) मिळवून देण्यासाठी संस्थेने प्रयत्नशील रहावे व कॅम्पस् प्लेसमेंटची व्यवस्था करणे आवश्यक राहिल. |

२. याबाबत पुढे स्पष्ट करण्यात येते की, राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना जे विद्यार्थी विहीत अभ्यासक्रमांसाठी बिगर आरक्षित प्रर्वगातून प्रवेश घेतील व विविध शासन निर्णयाद्वारे विहित केल्याप्रमाणे सर्व अटी व शर्ती पूर्ण करतील अश्या विद्यार्थ्यांकरीता लागू करण्यात आली आहे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६२४/१८/व्यय-५, दिनांक ०३.०७.२०१८ अनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८०८०७१७३७१३१४०८ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Sanjay A. Dharurkar

Digitally signed by Sanjay A. Dharurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, cn=Sanjay A. Dharurkar
Date: 2018.08.08 15:20:51 +05'30'

**( संजय औ. धारुरकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव
५. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
७. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई
८. सर्व सन्मानीय विधानपरिषद व विधानसभा सदस्य
९. आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक
११. आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष, न्यु एक्सेलसिअर बिल्डींग, ८ वा मजला, फोर्ट, मुंबई-४००००१
१२. सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, न्यु एक्सेलसिअर बिल्डींग, ८ वा मजला, फोर्ट, मुंबई-४००००१
१३. सचिव, शुल्क नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, ३०५, शासकीय तंत्रनिकेतन इमारत,४९,खेरवाडी, अलियावर जंग मार्ग,वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१
१४. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई

१५. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१७. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१८. आयुक्त, कृषी, महाराष्ट्र राज्य, पुणे
१९. आयुक्त, दुग्ध व्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२०. आयुक्त, मत्स्य व्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१. संचालक, पशु संवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
२२. कुलगुरु, सर्व विद्यापीठे
२३. कुलगुरु, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, ता.माणगांव, जि.रायगड
२४. कुलगुरु,महाराष्ट्र राज्य आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक
२५. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण परीक्षा मंडळ, शासकीय तंत्रनिकेतन इमारत,
२६. ४९,खेरवाडी, अलियावर जंग मार्ग,वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१
२७. सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालये (सर्व), (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
२८. सहसंचालक, उच्च शिक्षण, विभागीय कार्यालये (सर्व)
२९. महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
३०. सर्व जिल्हाधिकारी
३१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १/२, मुंबई / नागपूर
३२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई / नागपूर
३३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
३५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
३६. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
३७. सर्व संबंधित मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
३८. उप सचिव (मशि/विशि/अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
३९. अवर सचिव (तांशि-३, विशि-३), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
४०. कक्ष अधिकारी (मशि-२/मशि-४/तांशि-५/तांशि-६/साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई
४१. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
४२. अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक
४३. निवडनस्ती/तांशि-४